**महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस आणि गाईडस या संस्थेस वेतनेतर अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भास्कागा-३०२२/प्र.क्र.७/क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २९ मार्च, २०२२.

वाचा :- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.एससीजी-२००७/ प्र.क्र.१६/माशि-७ , दि. २१ नोव्हेंबर, २००८
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.भास्कागा-३०१६/ प्र.क्र.६८/क्रीयुसे-३ , दि. ५ नोव्हेंबर, २०१६
३) सह संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.भास्कागा/वेतनेतर अनुदान/२०२१-२२/का-५/५६१, दि.१० फेब्रुवारी,२०२२

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस आणि गाईडस, मुंबई या संस्थेस वरील संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वेतनेतर बाबींकरिता वार्षिक रु.२४,०८,६५०/- ( रु.चोवीस लाख आठ हजार सहाशे पन्नास फक्त) इतक्या रकमेस खर्चाकरिता मंजूरी दिली आहे. सदर वेतनेतर खर्चामध्ये कर्मचाऱ्यांचे उपदान व भविष्य निर्वाह निधी, मानद कार्यकर्त्यांचे मानधन, मेळावे इ.बाबींचा समावेश आहे.त्या अनुषंगाने एकूण २९७ गट-'क' व गट-'ड' संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या वेतनेतर खर्चाकरिता मागील थकबाकी ( सन २०१८-१९ ते २०२०-२१) तसेच चालू आर्थिक वर्षाकरिता खर्चासाठीचा निधी मंजूर व वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस आणि गाईडस, मुंबई या संस्थेच्या आस्थापनेवर गट-'क' व गट-'ड' संवर्गातील एकूण २९७ पदे मंजूर आहेत. या पदांवरील कर्मचाऱ्यांना उपदान व भविष्य निर्वाह निधी व अन्य वेतनेतर खर्चासाठी तरतूद उपलब्ध करण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२१ नोव्हेंबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये विहित करुन देण्यात आलेल्या बाबींवरील खर्चाकरिता एकूण रु.७५,८३,०००/- (रु.पंच्च्याहत्तर लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | आर्थिक वर्ष | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|
| १. | २०१८-२०१९ | रु. २४,०८,६५०/- |
| २. | २०१९-२०२० | रु. २४,०८,६५०/- |
| ३. | २०२०-२०२१ | रु. २४,०८,६५०/- |
| ४. | २०२१-२०२२ | रु. ३,५७,०५०/- |
| | **एकूण** | **रु. ७५,८३,०००/-** |

२. महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस आणि गाईडस, मुंबई या संस्थेच्या आस्थापनेच्या वेतनेतर बाबींवरील उपरोक्त खर्च आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी वित्त विभागाने खर्चाचे पूरक विवरणपत्र २०२१-२२ या वित्तीय प्रकाशनामध्ये समाविष्ट केलेला आहे.

३. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च "मागणी क्र. ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-(०२) बालवीर व वीरबाला महाराष्ट्र छात्रसेना, (०२)(०१) बालवीर सेवा व मार्गदर्शन-महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस व गाईडस मुंबई यांना सहायक अनुदाने (अनिवार्य) ३१,सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०४ ००३४)" या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या सुधारीत अंदाजाद्वारे निश्चित करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर तरतूद वितरीत करताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे :-

१) सदर तरतूद ज्या बाबींसाठी व ज्या आर्थिक मर्यादेत मंजूर केली आहे, त्याच बाबींसाठी व त्याच आर्थिक मर्यादेमध्ये खर्च करण्यात यावी.

२) उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार व विहीत कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा.

३) राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक तसेच अनुज्ञेय आर्थिक लाभासंदर्भात (उदा.उपदान इ.) निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय/वित्तीय नियमावली यातील तरतूदीनुसार वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. यासाठी लेखाधिकारी, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२९१८५७४९६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.03.29 18:58:18 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,

३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,

४) मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

५) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

६) मा.राज्य मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

७) सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई

८) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

९) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११) राज्य मुख्य आयुक्त, महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस आणि गाईडस संस्था, मुंबई

१२) राज्य चिटणीस (अ.का.) महाराष्ट्र राज्य भारत स्काऊटस आणि गाईडस संस्था, मुंबई

१३) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.

१४) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

१५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी (संचालनालयामार्फत)

१६) सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)

१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१८) अवर सचिव ( अर्थसंकल्प ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

१९) वित्त विभाग-व्यय-५, अर्थसंकल्प-८ व नियोजन विभाग-का.१४७१, मंत्रालय, मुंबई

२०) निवड नस्ती, क्रीयुसे-३